**सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात राज्य योजनांतर्गत योजनेच्या मंजूर तरतूदीमधून राज्यातील कारागृहात फॉगिंग मशिन खरेदी करण्यासाठी निधी वितरीत करण्यास मान्यता देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः जेएलएम-१३१४/प्र.क्र.१७८/तुरुंग-२

जागतिक व्यापार केंद्र, सेंटर नं. १, ३० वा मजला,
कफ परेड, मुंबई-४०० ००५
दिनांक: ९ मार्च, २०१५

**वाचा**

१) शासन निर्णय, गृह विभाग, क्र. जेएलएम-१३१४/प्र.क्र.१७८/तुरुंग-२, दि.१४.०१.२०१५.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अंदाज-२०१४/प्र.क्र. ११०/अर्थसंकल्प-३, दिनांक ०१.०७.२०१४.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अंदाज-२०१३/प्र.क्र. ८५/अर्थसंकल्प-३, दिनांक ०९.०२.२०१५.

**शासन निर्णय**

राज्यातील कारागृहातील वैद्यकीय सुविधा वाढविणे या योजनेकरिता सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात राज्य योजनांतर्गत योजनेच्या मंजूर तरतूदीमधून रुपये १८.३१ लक्ष (रुपये अठरा लक्ष एकतिस हजार फक्त) इतकी रक्कम अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. सदर तरतूदीमधून राज्यातील कारागृहात वैद्यकीय उपकरणातंर्गत रु.१७,६४,८५९/- इतक्या किंमतीची फॉगिंग मशीन खरेदीच्या अंदाजपत्रकास व वित्त विभागाच्या वरील वाचा-२ येथील परिपत्रकानुसार सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात राज्य योजनांतर्गत योजनेच्या मंजूर रुपये १८.३१ लक्ष इतक्या तरतूदीमधून ६० % रक्कम म्हणजेच रु. १०,९८,६००/- ( रु. दहा लक्ष अठ्ठ्यानऊ हजार सहाशे फक्त) वितरीत करण्यास वरील वाचा-१ येथील शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. आता वित्त विभागाने वरील वाचा-३ येथील दिनांक ०९.०२.२०१५ च्या शासन परिपत्रकान्वये योजनांतर्गत योजनेकरिता ७५ टक्केच्या मर्यादेत निधी वितरीत करण्यास सहमती दिली आहे. राज्यातील कारागृहातील वैद्यकीय सुविधा वाढविणे या योजनेकरिता ६० टक्के म्हणजेच रु. १०,९८,६००/- निधी वितरीत करण्यास यापूर्वी मान्यता दर्शविण्यात आली असल्यामुळे १५ टक्के म्हणजेच रुपये २,७४,६५०/- ( अक्षरी रु. दोन लक्ष चौऱ्याहत्तर हजार सहाशे पन्नास फक्त) इतका निधी वितरीत करण्यास सहमती दर्शविण्यात येत आहे.

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-१००८/प्र.क्र.७०/ २००८/ विनियम, दि.१५ मे, २००९ व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग-पहिला, उप विभाग-दोन, अनुक्रमांक-४, नियम ७ मधील स्तंभ ६ मध्ये नमूद करण्यात आलेल्या अटीस अधीन राहून तसेच प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

३. यावरील होणारा खर्च सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात मागणी क्र. बी-५ मुख्य लेखाशीर्ष २०५६- तुरुंग (००) (१७) तुरुंगातील वैद्यकीय सुविधा वाढविणे (२०५६ ०२१३), ५२, यंत्रसामुग्री व साधनसामुग्री या लेखाशीर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थसंकल्प-३, दिनांक ०१.०७.२०१४ सोबत जोडलेल्या महाराष्ट्र विनियोजन २०१४ च्या परिशिष्टातील अ.क्र. ३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे अर्थसंकल्पात समाविष्ट असलेल्या योजनांतर्गत जुन्या योजनांच्या स्वरुपात अथवा व्याप्तीत बदल होत नसल्यामुळे प्रस्तुत प्रकरणाच्या खर्चास नियोजन विभाग तसेच वित्त विभागाची मान्यता घेण्याची आवश्यकता नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०९१४४६१२९७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Ishwar Giri

Digitally signed by Ravindra Ishwar Giri
DN: CN = Ravindra Ishwar Giri, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.03.09 15:48:12 +05'30'

**( र. ई. गिरी )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग.

प्रत,

- अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
- महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई,
- महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई,
- कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य, पुणे,
  जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
- अवर सचिव (बीयुडी-१) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई -३२,
- निवड नस्ती (तुरुंग-२)